**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता निसर्ग पर्यटन योजनेंतर्गत वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवर इ. ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१८/प्र.क्र.७९ /फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : ८ जून, २०१८**

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अंदाज-२०१५/प्र.क्र.३६/ फ-११, दि. १६.०६.२०१५

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

३) अप्पर प्रधान मुख्य वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य , पुणे यांचे क्रमांक कक्ष -१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/२२५/२०१८-१९, दि. ११.०५.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात सिंचन प्रकल्पाची संख्या मोठया प्रमाणात आहे. यामुळे जलाशये निर्माण होऊन त्यामध्ये स्थलांतरीत पक्षी मोठया प्रमाणावर येताना आढळतात. राज्यात जायकवाडी, नांदूर, मध्यमेश्वर, उज्जनी इत्यादी जलाशये यासाठी प्रसिध्द आहेत. त्याचबरोबर अनेक शहरांभोवती, शहरासाठी पिण्याचे पाणी तसेच औद्योगिक क्षेत्रासाठी पाणी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने मध्यम प्रकल्प, तलाव निर्माण करण्यात आले आहेत. या जलाशयांमध्ये देखील काही प्रमाणावर स्थलांतरीत पक्षी, स्थानिक पक्षी, पशु, मनुष्य यांचा वावर असतो, तसेच या जलाशयांमध्ये मासे, पाणवनस्पती इत्यादी आढळतात. या जलाशयामध्ये Bio- Pressure वाढत असल्याने जलाशयातील जैव विविधता धोक्यात आली आहे. तसेच जलाशयाचे प्रदूषण होताना आढळते. यास्तव वनेतर क्षेत्रातील जलाशयातील जैव विविधतेचे संवर्धन व व्यवस्थापन होणे आवश्यक आहे.

२. यास्तव मागणी क्र. सी-०७-२४०६, वनीकरण व वन्यजीवन राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०६) निसर्ग पर्यटन ( राज्य ) (२४०६ २२९५ ) या योजनेंतर्गत सन २०१८-१९ करिता एकूण ४ योजनांकरिता रु.१२०००.०० लक्ष निधी मार्च २०१८ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन यासाठी रु.२००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. आता अप्पर प्रधान मुख्य वनसरंक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी रु.२००.०० लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

३. सदर योजनेसाठी शासन निर्णय दि.१६.०६.२०१५ अन्वये सन २०१५-१६ ते २०१९-२० करिता खालीलप्रमाणे आवश्यक निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीच्या मर्यादेत निधी वितरित करणे आवश्यक आहे.

| २०१५-१६ | २०१६-१७ | २०१७-१८ | २०१८-१९ | २०१९-२० | एकूण आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|---|
| ६७ लक्ष | १२० लक्ष | १०८ लक्ष | ६० लक्ष | ४२ लक्ष | ३९७.०० लक्ष |

उपरोक्त योजनेसाठी सन २०१५-१६ ते सन २०१८-१९ पर्यंतच्या कालावधीसाठी एकूण ३५५.०० लक्ष एवढा निधी शासन निर्णय दि. १६.०६.२०१५ नुसार मंजूर असून त्यापैकी सन २०१७-१८ पर्यंत रु. २००.९० लक्ष खर्च करण्यात आला आहे. त्यामुळे सन २०१८-१९ करिता १५४.१० लक्ष इतका निधी वितरित करण्यासाठी उपलब्ध आहे.

४. तथापि, सदर योजनेसाठी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात रु.२००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात एप्रिल २०१८ ते डिसेंबर २०१८ या ९ महिन्यांच्या कालावधीकरीता अर्थसंकल्पित निधीच्या ७०% मर्यादेत रु.१४०.०० लक्ष इतका निधी वितरित करता येणे शक्य आहे. त्यानुसार अर्थसंकल्पित निधीच्या ७० % म्हणजेच रु. १४०.०० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या निसर्ग पर्यटन- राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(०६) **पाणथळे, सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५)** हया योजनेकरिता सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात माहे जून २०१८ ते डिसेंबर २०१८अखेर या ७ महिन्यांच्या कालावधीकरीता अर्थसंकल्पीत निधीच्या ७० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.१४०.०० लक्ष निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. विवरणपत्र-१ प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यवध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

५. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनाक ०२.०४.२०१८ परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७,**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,राज्य योजनांतर्गत योजना,**

**८००(०२)(०६) निसर्ग पर्यटन ( राज्य )**

**पाणथळे , सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५ )**

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०८१३१९३६९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4a0f51184eb8e42644affc326f734133e2da973d24448c2cf323cb1cb2e347e, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2018.06.08 13:22:26 +05'30'

**(विजय खेडेकर)**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती/फ-११.

## विवरणपत्र -१

### साववि-२०१८/प्र.क्र.७९/फ-११ दि. ८ जून २०१८ चे सहपत्र

**योजनेचे नाव:-** "वनेतर क्षेत्रातील पाणथळे , सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन" **मुख्यलेखाशीर्ष :- (२४०६ २२९५)**

(रु. लाखात)

| सविस्तर लेखाशीर्ष | २०१८-१९ करिता अर्थ-संकल्पित तरतूद | वित्त विभागाच्या दि. ०२.०४.२०१८च्या परिपत्रका नुसार वितरणासाठी उपलब्ध तरतूद | जुन २०१८ | जुलै २०१८ | ऑगस्ट २०१८ | सप्टेंबर २०१८ | ऑक्टो. २०१८ | नोंव्हे. २०१८ | डिसें. २०१८ | एकूण वितरित निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | | | | | | | ६ |
| मागणी क्र. सी-०७,<br>२४०६, वनीकरण व वन्यजीवन,<br>राज्य योजनांतर्गत योजना,<br>८००(०२)(०६)<br>निसर्ग पर्यटन ( राज्य )<br>वनेतर क्षेत्रातील पाणथळे , सरोवरे इ. ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५ )<br>५०-इतर खर्च | २००.०० | १४०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | १४०.०० |

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4a0f51184eb8e42644affc326f734133e2da973d24448c2cf323cb1cb2e347e, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2018.06.08 13:22:44 +05'30'

(विजय खेडेकर)
अवर सचिव, महसूल व वन विभाग